**संचालनालय, लेखा व कोषागारे अधिनस्त जिल्हा कोषागारे कार्यालयांकरिता १४ वाहने (स्टाफ कार) अनुज्ञेय करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१८/प्र.क्र.७७/कोषा-प्रशा-४,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ जानेवारी, २०२०

वाचा :- १. वित्त विभाग, शासन पत्र क्र.वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.०९.२००१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२०१३/प्र.क्र.६/२०१३/कोषा प्रशा-४,दि.२४.१२.२०१३

**प्रस्तावना-:**

वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२०१३/प्र.क्र.६/२०१३/कोषा प्रशा-४,दि.२४.१२.२०१३ अन्वये राज्य वाहन आढावा समितीने संचालनालय, लेखा व कोषागारे, मुंबई यांच्या अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांच्या कर्तव्य व जबाबदाऱ्यांचा विचार करुन अशा पदांकरिता लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई कार्यालयास ४ वाहने तसेच अधिनस्त ६ विभागीय कार्यालयांना प्रत्येकी १ याप्रमाणे ६ वाहने व अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांचेसाठी १ वाहन याप्रमाणे एकूण ११ वाहने मंजूर केली आहेत. तसेच ५ कॅश व्हॅन्सचा वापर ती निर्लेखित होईपर्यंत करु शकतील, असा निर्णय घेण्यात आला आहे.

तथापि, जिल्हा कोषागार कार्यालयांच्या अधिनस्त काही उपकोषागारे आदिवासी लोकसंख्या असलेल्या वनव्याप्त, नक्षलग्रस्त क्षेत्रात समाविष्ट आहेत. सदरचे तालुके अतिशय दुर्गम व डोंगराळ भागात मुख्यालयापासून दूर अंतरावर असून सार्वजनिक वाहतुकीच्या सुविधा फारशा उपलब्ध नाहीत. सबब, प्रभावी प्रशासकीय नियंत्रणाच्या दृष्टीने अशा १४ कोषागार कार्यालयांना जीप या प्रकारातील वाहने (स्टाफ कार) अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

संचालनालय, लेखा व कोषागारे, मुंबई यांच्या अधिपत्याखालील जिल्हा कोषागार कार्यालयांना त्यांचे अधिनस्त उपकोषागार कार्यालयांवर प्रभावी नियंत्रण ठेवणे, मुद्रांक व प्रमाणकांची ने-आण करणे इत्यादी कार्यालयीन कामकाज गतीमान पध्दतीने पार पाडता यावे, यासाठी राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेनुसार, वाहनचालकांच्या पदनिर्मितीच्या मान्यतेच्या अधिन राहून पुढीलप्रमाणे १४ जिल्हा कोषागार कार्यालयांसाठी जीप प्रकारातील १४ वाहने (स्टाफ कार) अनुज्ञेय करण्यात येत आहेत. वाहनचालकांची पदनिर्मिती झाल्यानंतरच प्रत्यक्ष वाहने खरेदी करता येतील.

| अ.क्र. | प्रादेशिक विभागीय कार्यालयाचे नांव | कोषागार कार्यालयांचे नांव |
|---|---|---|
| १. | सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोंकण विभाग | १) कोषागार कार्यालय, रायगड |
| | | २) कोषागार कार्यालय, पालघर |
| | | ३) कोषागार कार्यालय, ठाणे |
| २. | सहसंचालक, लेखा व कोषागारे, पुणे विभाग, पुणे | ४) कोषागार कार्यालय, पुणे |
| | | ५) कोषागार कार्यालय, सांगली |
| ३. | सहसंचालक, लेखा व कोषागारे, नाशिक विभाग, नाशिक | ६) कोषागार कार्यालय,नाशिक |
| | | ७) कोषागार कार्यालय, नंदूरबार |
| ४. | सहसंचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद | ८) कोषागार कार्यालय, औरंगाबाद |
| | | ९) कोषागार कार्यालय, नांदेड |
| ५. | सहसंचालक, लेखा व कोषागारे, अमरावती विभाग, अमरावती | १०) कोषागार कार्यालय, अमरावती |
| | | ११) कोषागार कार्यालय, यवतमाळ |
| ६ | सहसंचालक, लेखा व कोषागारे,नागपूर विभाग, नागपूर | १२) कोषागार कार्यालय,नागपूर |
| | | १३) कोषागार कार्यालय, गडचिरोली |
| | | १४) कोषागार कार्यालय,गोंदिया |

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३७५/विनियम, दि.२७.०८.२०१९ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashatra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२०२००११४१५३७५४०७०५** असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.01.14 15:17:11 +05'30'

**(इंद्रजित गोरे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता )-१/२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२) अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
४) सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
५) कक्ष अधिकारी, वित्त विभाग/विनियम, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती/कोषा-प्रशा-४